मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल करावयाच्या याचिकेसंबंधित सर्व मंत्रालयीन विभागाकरीता सूचना.

**महाराष्ट्र शासन**

**विधी व न्याय विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२८१५/प्र.क्र.१५१ /१५/का.८**

मादाम कामा रोड, मुख्य इमारत, पाचवा मजला,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: ८/१०/२०१५.

## परिपत्रक

सरकारी वकील, सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली या कार्यालयाद्वारे मा. सर्वोच्च न्यायालयात महाराष्ट्र शासनाच्या वतीने विविध प्रशासकीय विभागांतर्गत दिवाणी व फौजदारी प्रकरणांमध्ये विशेष अनुमती याचिका (SLP) व दिवाणी/फौजदारी अपील दाखल करण्यात येतात. सर्व मंत्रालयीन विभागांनी मा. सर्वोच्च न्यायालयात याचिका दाखल करतेवेळी होणारा विलंब टाळण्यासाठी खालील सुचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१) संबंधित प्रशासकीय विभागाच्या नोडल अधिका-यांनी न्यायालयीन प्रकरणात मा. न्यायालयाने दिलेले आदेश/निदेश तात्काळ विभागप्रमुखांच्या निदर्शनास आणावेत.

२) संबंधित सरकारी वकीलांना न्यायालयाने पारीत केलेल्या आदेशाविरूध्द अपील करण्याजोगे आहे किंवा कसे, याबाबत त्वरीत अभिप्राय देण्याची विनंती करावी.

३) प्रशासकीय विभागाने मा. सर्वोच्च न्यायालयात अपील दाखल करण्याचे प्रस्ताव तपासून आवश्यक त्या कागदपत्रांसह विधि व न्याय विभागाकडे अभिप्रायार्थ पाठवावेत.

४) संबंधित प्रशासकीय विभागाने विधि व न्याय विभागाकडून सर्वोच्च न्यायालयात दाखल करावयाच्या अपीलाच्या प्रस्तावास मान्यता मिळाल्यानंतर कोणताही विलंब न करता सर्व संबंधित कागदपत्रे अपील करावयाच्या आदेशाच्या प्रमाणित प्रतीसह सरकारी वकील, सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली कार्यालयास पाठवावेत.

५) सरकारी वकील, सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली कार्यालयाकडून प्राप्त विशेष अनुमती याचिकेचा मसूदा व प्रतिज्ञापत्र तात्काळ तपासून सदर कार्यालयास पाठवणे आवश्यक आहे व जबाबदार अधिका-यांनी सरकारी वकील, सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली कार्यालयात आवश्यक त्या प्रकरणात व्यक्तीश: जावे.

६) मराठी/इतर भाषेतील कागदपत्रांचे इंग्रजी भाषांतर करूनच सरकारी वकील, सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे पाठवावे.

७) सरकारी वकील, सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांच्याशी पत्रव्यवहार करताना संबंधित जबाबदार अधिकारी/नोडल अधिकारी यांचा दूरध्वनी क्रमांक, फॅक्स क्रमांक, ई-मेल आयडी इ. नमूद करावे.

८) याचिका/अपील विहित मुदतीत दाखल करणे आवश्यक असल्यामुळे ज्या न्यायालयीन प्रकरणी विशेष अनुमती याचिका/अपील दाखल करावयाचे आहे अशा प्रकरणी मा. उच्च न्यायालयाच्या निकालाची प्रमाणित प्रत मिळण्याची वाट न पाहता सदर प्रत मा. उच्च न्यायालयाच्या संकेतस्थळावरून डाउनलोड करून पुढील प्रक्रिया सुरू करावी.

९) सदर प्रक्रीयेतील विलंब टाळण्यासाठी माहिती तंत्रज्ञानाच्या अद्ययावत सुविधांचा वापर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००८१५२१४४६६१२ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

N J Jamadar

Digitally signed by N J Jamadar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Secretary And Senior Legal Advisor, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc1a04c87922c611cd86db0417549c441857561c576c21b21f3c8d180884505e, cn=N J Jamadar
Date: 2015.10.08 15:23:07 +05'30'

(एन. जे. जमादार)
प्रधान सचिव व विधि परामर्शी

**प्रत,**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मुंबई.
२. प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.
३. सर्व मंत्रालयीन विभाग.
४. सरकारी वकील, सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली.
५. निवडनस्ती.